वरिष्ठ वास्तुशास्त्रज्ञ या पदावरुन उपमुख्य वास्तुशास्त्रज्ञ या पदावर पदोन्नती / पदस्थापना.

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक बांधकाम विभाग

**शासन आदेश क्रमांक : पीओजी-१२१४/प्र.क्र. २१७ (१)/सेवा-१**

मंत्रालय, मुंबई-४०००३२

**दिनांक : १२ एप्रिल, २०१७**

**शासन आदेश :-**

सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत वास्तुशास्त्र संघटनेतील वरिष्ठ वास्तुशास्त्रज्ञ या संवर्गात कार्यरत श्रीमती अनिता सुधीर खेरडे यांना उपमुख्य वास्तुशास्त्रज्ञ या पदावर वेतनसंरचना पीबी-३ वेतन बँड रूपये १५६००-३९१०० ग्रेड वेतन ७६००/- या वेतनश्रेणीत पदोन्नती देण्यात येत आहे. पदोन्नतीनंतर उपमुख्य वास्तुशास्त्रज्ञ म्हणून त्यांची पदस्थापना त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे.

| क्र. | अधिकाऱ्याचे नाव | कार्यरत असलेले ठिकाण | पदस्थापनेचे ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|---|
| १ | श्रीमती अनिता सुधीर खेरडे (इ.मा.व.) | वरिष्ठ वास्तुशास्त्रज्ञ, नागपूर | उपमुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, नागपूर | रिक्त पदी |

२. श्रीमती खेरडे यांची सदर पदोन्नती तदर्थ तत्वावर, महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या तसेच पुढे नमूद केलेल्या बाबींच्या अधीन राहून करण्यात येत आहे :-

i) वरील पदोन्नती तदर्थ व मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे प्रलंबित असलेल्या रिट याचिका क्रमांक २७९७/२०१५ महाराष्ट्र राज्य विरुध्द श्री. विजय घोगरे व इतर तसेच संलग्न इतर न्यायालयीन प्रकरणामध्ये होणाऱ्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहतील.

ii) वरील पदोन्नती मा. मुंबई उच्च न्यायालयात दाखल असलेल्या याचिका क्रमांक ८४५२/२००४ वरील न्यायालयाच्या अंतिम निकाल तसेच आरक्षण अधिनियम २००१ विरुध्द, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे दाखल याचिका क्रमांक टी-१/२०१४ मधील अंतिम निकालाच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

३. मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी आवश्यक ती पर्यायी व्यवस्था करुन पदोन्नत अधिकाऱ्यांना नवीन नियुक्तीच्या ठिकाणी रुजू होण्यासाठी तात्काळ कार्यमुक्त करावे व त्यांना नवीन नियुक्तीच्या ठिकाणी हजर होण्यास सांगावे.

४. श्रीमती खेरडे यांना कळविण्यात येते की, त्यांनी पदोन्नतीचे / नियुक्तीचे आदेश प्राप्त झाल्यापासून एक महिन्याच्या आत नियुक्तीच्या ठिकाणी हजर होणे आवश्यक आहे. त्यानुसार ते विहीत मुदतीत नियुक्तीच्या ठिकाणी हजर झाले नाहीत, तर त्यांना सदर पदोन्नतीत स्वारस्य नाही असे गृहीत धरुन शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : एसआरव्ही-१०८७/ ११३१/ प्र.क्र.११-८९/बारा, दिनांक ३० एप्रिल, १९९१ मधील तरतुदीनुसार शासनस्तरावरुन त्यांची पदोन्नती रद्द करण्यात येईल, याची कृपया नोंद घ्यावी. तसेच, त्यांनी अनधिकृतरित्या

रजेवर जाऊ नये. तसेच, त्यांचे लक्ष महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९ मधील नियम २३ कडे वेधण्यात येत आहे. सदर नियमातील तरतूदी लक्षात घेता, त्यांनी पदस्थापनेत बदल करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील.

५. श्रीमती खेरडे यांनी पदग्रहण केल्यापासून एक महिन्याच्या आत वेतननिश्चितीचा विकल्प द्यावा असा विकल्प विहित मुदतीत न दिल्यास त्यांची वेतननिश्चिती महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील नियम क्र. ११ (१) (ए) अनुसार पदोन्नतीचा दिनांक विचारात घेवून करण्यात यावी.

६. श्रीमती खेरडे यांनी नवीन नियुक्तीच्या ठिकाणी हजर होताच पदभार स्वीकारल्याचा दिनांक शासनास तसेच संचालक, माहिती तंत्रज्ञान समन्वय केंद्र, हॉटेल सागर प्लाझा समोर, कॅंप, पुणे यांना कळवावा.

७. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४१२१४५१२६५११८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Mridula Sanjeev Deshpande

Digitally signed by Mridula Sanjeev Deshpande
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Mridula Sanjeev Deshpande
Date: 2017.04.12 14:53:42 +05'30'

**( मृ.सं.देशपांडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,
२. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
३. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई/ पुणे/ नाशिक/ औरंगाबाद/ अमरावती/ नागपूर/ विशेष प्रकल्प, मुंबई/राष्ट्रीय महामार्ग विभाग, नवी मुंबई,
४. मुख्य अभियंता (विद्युत), मुंबई,
५. मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
६. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई, (पत्राने),
७. सार्वजनिक बांधकाम विभागातील सर्व अधीक्षक अभियंते,
८. संचालक, उपवने व उद्याने, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
९. संचालक, माहिती तंत्रज्ञान समन्वय केंद्र, हॉटेल सागर प्लाझा समोर, कॅंप पुणे,
१०. महालेखापाल-२ ( लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र, नागपूर,
११. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर,
१२. श्रीमती अनिता सुधीर खेरडे, वरिष्ठ वास्तुशास्त्रज्ञ, नागपूर,

१३. सामान्य प्रशासन विभाग, का.-१३/१६-ब, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४. मा. मंत्री, सा.बां. (सार्वजनिक उपक्रम वगळून), महसूल, मदत व पुर्नवसन यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१५. मा. मंत्री, सा. बां. (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई,
१६. मा. राज्यमंत्री, सा. बां. (सार्वजनिक उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१७. मा. राज्यमंत्री, सा. बां. (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई,
१८. प्रधान सचिव (सा.बां.), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई, यांचे स्वीय सहायक,
१९. सचिव ( रस्ते / बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई, यांचे स्वीय सहायक,
२०. सर्व सहसचिव / उपसचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
२१. कार्यासन आस्था-१, आस्था- ३, सेवा-६, रोखशाखा, संगणक कक्ष, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
२२. निवडनस्ती.